**विकास आराखड्यातील मंजूर प्रयोजनार्थ नगरपालिका / महानगरपालिका यांना प्रदान केलेला शासकीय भूखंड प्रयोजन बदलून अन्य प्रयोजनासाठी वापरात येत असल्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महसूल व वन विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : जमीन ११/२००८/प्र.क्र.१६८/ज-१
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ०४ ऑक्टोंबर, २०१०.

**वाचा :-**

शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्रमांक एलएनडी १०८३/२७०२/प्र.क्र.१९०९/जी-५, दि.४ फेब्रुवारी, १९८३.

**शासन परिपत्रक :-**

संदर्भीय दिनांक ४ फेब्रुवारी, १९८३ च्या शासन परिपत्रकान्वये स्थानिक स्वराज्य संस्था, शासकीय उपक्रम, मंडळे, महामंडळे यांना शासकीय जमीन प्रदान करण्याबाबत धोरण निश्चित करण्यात आले आहे. त्यानुसार नगरपालिका व महानगरपालिका यांच्या विकास आराखड्यामध्ये विविध प्रयोजनार्थ आरक्षित असलेले भूखंड संबंधित संस्थांना प्रदान करण्याबाबत शासनाचे स्थायी आदेश देण्यात आले आहेत. या स्थायी आदेशानुसार सार्वजनिक सुविधांसाठी (Public conveniene) वितरित करण्यात येणारे भूखंड हे पुर्णतः मोफत प्रदान करण्यात येतात. सार्वजनिक प्रयोजनाकरीता (Public purpose) आरक्षित असलेले भूखंड प्रदान करताना प्रारुप विकास आराखडा ज्या दिनांकास प्रसिध्द करण्यात आला, त्या दिनांकाचे मुल्यांकन वसूल करण्यात येते तर, अन्य प्रयोजनासाठी नगर पालिका अथवा महानगरपालिका यांना जागा मंजूर करताना जागेचे पूर्ण बाजारमूल्य चालू बाजारभावाने वसूल करण्यात येते.

२. अशा पध्दतीने सार्वजनिक प्रयोजनार्थ व सार्वजनिक सुविधांकरीता मोफत अथवा प्रारुप विकास आराखडा प्रसिध्द होण्याच्या दिनांकास असलेल्या किंमतीने भूखंड मंजूर केल्यानंतर या भूखंडाचे विकास आराखड्यामधील आरक्षण बदलून घेऊन सदर भूखंडाचा वापर सार्वजनिक प्रयोजनार्थ अथवा सार्वजनिक सुविधा या ऐवजी अन्य प्रयोजनासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून करण्यात येत असण्याची शक्यता नाकारता येत नाही. असे झाले असल्यास सार्वजनिक प्रयोजनार्थ अथवा सार्वजनिक सुविधा यांच्या व्यतिरिक्त अन्य वापर सुरु करण्यात आलेल्या भूखंडाची त्या त्या वेळच्या प्रचलित बाजारभावाने किंमत शासनास मिळणे आवश्यक आहे. यासाठी उक्त स्थायी आदेशाच्या दिनांकानंतर जे भूखंड सार्वजनिक प्रयोजनार्थ अथवा सार्वजनिक सुविधांकरीता वितरीत करण्यात आलेले होते, ते भूखंड त्याच प्रयोजनार्थ स्थानिक स्वराज्य संस्थेकडून वापरात येत आहेत किंवा कसे, तसेच, वापरात बदल झालेला असल्यास तो कोणत्या दिनांकास झाला, वापरात बदल शासनाच्या पुर्वमान्यतेने झाला आहे किंवा कसे व वापरातील बदलानुसार होणारे मुल्यांकन स्थानिक स्वराज्य संस्थेकडून वसूल केले आहे काय? या बाबींची तपासणी करुन जमिनीची किंमत / अनुज्ञप्ती फी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेकडून वसूल करणे आवश्यक आहे.

३. सबब, सार्वजनिक प्रयोजनार्थ व सार्वजनिक सुविधांकरीता मंजूर भूखंड त्याच प्रयोजनार्थ वापरण्यात येत आहेत काय, वापरात बदल झाला असल्यास तो कोणत्या दिनांकास झाला, त्यास शासनाची

पुर्व मान्यता घेतली आहे काय ? याबाबत तपासणी करण्याची मोहिम हाती घेण्यात यावी. प्रयोजनात बदल करण्यात आला असल्यास (जसे वाणिज्यिक, औद्योगिक वा अन्य) ज्या दिवसापासून वापरात बदल केलेला आहे, त्या दिवसापासून वापरात असलेल्या प्रयोजनासाठी लागु असलेल्या दराने जागेची किंमत व त्यावर व्याज वसूल करण्यात यावे. विकास आराखड्यात अनुज्ञेय असलेल्या प्रयोजना व्यतिरिक्त अन्य प्रयोजनासाठी वापर सुरु असल्यास सदर वापर तात्काळ बंद करण्यात यावा. वरील कार्यवाही पुढील तीन महिन्यांत पूर्ण करण्यात यावी. सदर कार्यवाही कालबध्द रीतीने पुर्ण करण्यासाठी सर्व महानगरपालिका / नगरपालिका यांनी सर्वतोपरी सहकार्य करावे. तसेच, यापुढेदेखील अशा पध्दतीने होणाऱ्या वापरातील बदलावर बारकाईने लक्ष ठेवून शासनाच्या धोरणानुसार होणारी किंमत/अनुज्ञप्ती फी वसूल करण्यात यावी.

४. हा शासन निर्णय नगर विकास विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१०१००४१८५१०४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

***सही/-***
**(शिवाजी गोरे )**
कार्यासन अधिकारी,
महसूल व वन विभाग

प्रत:

सर्व विभागीय आयुक्त.
जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मंत्रालयीन विभाग.
सर्व उपविभागीय अधिकारी / सर्व तहसीलदार
मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
अप्पर मुख्य सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक
अप्पर मुख्य सचिव (नगर विकास) यांचे स्वीय सहायक
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र -२, नागपूर.
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
महसूल व वन विभागतील सर्व सहसचिव / उपसचिव व नियंत्रण अधिकारी, मंत्रालय, मुंबई - ३२
"ज" समुहातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.